(२०५) 20150422170543127

शिबगणवाडी खारभूमी विकास योजना,
ता. दापोली, जि. रत्नागिरी
प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्र.: खाभूयो २००६/८५५/(३१८/२००६)/खारभूमी,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- २८/१२/२००६

पहावे:-१) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई यांचे
पत्र क्रमांक :- ३८०६/३८१/शिबगणवाडी/ता १/३१७८, दिनांक २४/०७/२००६.

प्रस्तावना :

तालुका दापोली, जिल्हा रत्नागिरी येथील शिबगणवाडी खारभूमी योजनेचा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

## शासन निर्णय

१) तालुका दापोली, जिल्हा रत्नागिरी येथील शिबगणवाडी खारभूमी योजनेस सन २००३-२००४ च्या दरसूचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रुपये ३४,७५,१६७/-(रुपये चौतीस लक्ष पंच्याहत्तर हजार एकशे सदुसष्ट फक्त, यापैकी रुपये २७,६९,०५७/- कामाप्रित्यर्थ व रुपये ७,०६,११०/- अनुषंगिक खर्च) रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यांत आला आहे.

२) या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशीर्ष "" ४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (५०२) मृदसंधारण-खार जमीन योजना (१) बांधकाने योजनांतर्गत " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागवावा.

हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र. एपीएच १०७३/३२६५३/ई(२), दिनांक २१.३.१९७४ मधील परिशिष्ट क्र ३ (अ) व शासन निर्णय, वित्त विभाग, क्र विअप्र १०.०४/प्र.क्र. ३३/२००४/विनियम, दि. २९.११.२००५ मधील तरतुदीनुसार आंतरवित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान केलेली प्रशासकीय मान्यता अ.क्र. (६/२००६) वर नोंदविण्यांत आलेली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( रा. त. कुंभणे )
शासनाचे अवर सचिव

प्रत अंदाजपत्रकाच्या गोषवा यासह

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी अभियंता, दक्षिण रत्नागिरी खारभूमी विकास विभाग, कुवारबांव, रत्नागिरी (५ प्रती)
अर्थशाखा (३ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, रत्नागिरी
स्वीय सहाय्यक, राज्यमंत्री (खारजमिनी), मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई,
खारभूमी कार्यासन (संग्रहार्थ)

शासन [illegible] – खाभूयो २००६/८५५/(३१८/२००६)/खारभूमी,

दि. २६/१२/२००६ चे सहपत्र

विवरणपत्र

शिबगणवाडी खारभूमी विकास योजना, ता. दापोली, जि. रत्नागिरी
(अंदाजपत्रकाचा गोषवारा)

| अ.क्र | बाब | एकूण (रुपये) |
|---|---|---|
| १ | "ए" प्राथमिक | २८,५७२ |
| २ | " बी" (भूसंपादन) | २६,३९५ |
| ३ | "सी" कामे | १९,९७,०९६ |
| ४ | "एफ" उघाडी काम | ६,३२,०२३ |
| ५ | "के" इमारती | ५,००० |
| ६ | "एम" वृक्षारोपण | ६,०४५ |
| ७ | "ओ" संकीर्ण | २९,९५० |
| ८ | "पी" देखभाल | ६,५७३ |
| ९ | "आर" दळणवळण | ३७,४०३ |
| | कामाप्रीत्यर्थ | २७,६९,०५७ |
| | आनुषंगिक खर्च (भूसंपादन किंमत वगळून २५.५० टक्के) | ७,०६,११० |
| | एकूण | ३४,७५,१६७ |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित होणारे क्षेत्र (हेक्टर) | ३० हेक्टर |
| प्रति हेक्टरी किंमत (रु.) | १,१५,८३९ < १,१८,७५०/- |
| लाभव्यय गुणोत्तर | २.२९ > १.०० |
| दरसूची वर्ष | २००३-२००४ |